**विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक या संस्थेतील वसतीगृह तथा आवार व्यवस्थापक वर्ग-३ या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. प्रतिनि २०२४/प्र.क्र.७२/प्रशि-४ (१२-अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०५ जुलै, २०२४.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र. एसआरव्ही -२०११/प्र.क्र.१३७/कार्या-१२, दि.१७.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दि.१६.०२.२०१८.
३) संचालक, विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक यांचे पत्र क्र.विप्रप्रसं/कक्ष ६/ कावि/३०/२०२४/जा.क्र.५४,दि.१८.०३.२०२४.
४) जलसंपदा विभाग पत्र क्रमांक- संकिर्ण ११२४/प्र.क्र.२१२/आस्था(अतांत्रिक), दि.२६.०६.२०२४.

**शासन आदेश :-**

विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक या राज्य प्रशिक्षण धोरणान्वये घोषित करण्यात आलेल्या विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेत रिक्त असलेल्या वसतीगृह तथा आवार व्यवस्थापक वर्ग -३ (वेतनश्रेणी एस-१३-३५४००-११२४००) या पदाकरीता प्रतिनियुक्ती धोरणाच्या प्रचलित कार्यपध्दतीनुसार श्री.पंकजकुमार भिका नेरकर, प्रथम लिपिक, तापी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग यांची खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | नाव /पदनाम/वेतनश्रेणी | मुळ प्रशासकीय विभाग | प्रतिनियुक्तीचे पद/ वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीचा दिनांक | प्रतिनियुक्तीचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.पंकजकुमार भिका नेरकर, प्रथम लिपिक, तापी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, (एस-१३-३५४००-११२४००) | जलसंपदा विभाग | वसतीगृह तथा आवार व्यवस्थापक वर्ग -३ (एस-१३-३५४००-११२४००) | आदेशाच्या दिनांकापासून | ३ वर्षे |

२. तरी जलसंपदा विभागाने श्री. पंकजकुमार भिका नेरकर, प्रथम लिपिक, तापी जलविद्युत व उपसा सिंचन यांच्या प्रतिनियुक्तीची नोंद घेवून आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर प्रतिनियुक्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....) नियम १९८१ च्या परिशिष्ट-२ मधील पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहील. :-

१) प्रस्तुत प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी संबंधित विभागास लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने सेवेची आवश्यकता वाटल्यास सदर अधिका-यास परत बोलविण्यात येईल. विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक या संस्थेस वरील अधिकाऱ्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यास संबंधितांना ३ महिन्याची नोटीस द्यावी लागेल. त्याचप्रमाणे शासनास सदर बाब अवगत करण्यात यावी.

२) प्रतिनियुक्तीवर असतानाच्या कालावधीतील वेतनाचा/रजा वेतनाचा खर्च विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक या संस्थेने करावा.

३) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....) नियम १९८१ च्या परिशिष्ट-४ मध्ये विहित केलेल्या दरानुसार विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक या संस्थेकडून रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान देण्यात यावे.

४) सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीमधील वर्गणी चालू ठेवण्यात यावी.

५) संबंधित अधिका-यांविरुध्द विभागीय चौकशी करावयाची झाल्यास त्यांच्या सेवा मूळ विभागाकडे परत करण्यात याव्यात.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०५१२११०९२०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SMITA PRASAD JOSHI

Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISRTATION DEPARTMENT, 2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2024.07.05 12:22:15 +05'30'

**( स्मिता जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति, :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपूर
२. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग,
३. उपसचिव(आस्था(अतांत्रिक)), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक.
५. अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, जळगाव
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.नाशिक
७. सहायक लेखा अधिकारी, विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था नाशिक,
८. श्री.पंकजकुमार भिका नेरकर, प्रथम लिपिक, तापी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग,जळगाव

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१. अपर मुख्य सचिव(सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. निवडनस्ती सा.प्र.वि./प्रशि-४ (१२-अ).